राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमांतर्गत अंध विद्यालयातील विद्यार्थ्यांची नेत्र तपासणी व उपचाराकरीता राज्यस्तरीय/जिल्हास्तरीय व मुंबई स्तरीय नेत्रचिकित्सा मंडळ स्थापन करणेबाबत....

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः अंनिका-२०१३/प्र.क्र.२५५/आरोग्य-५,

जी.टी.रुग्णालय आवार, कॉम्प्लेक्स बिल्डींग,
८ व १० वा मजला, मुंबई.
तारीख: २ मे, २०१५.

**संदर्भ :**

१) मा. सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटीशन क्र. २२८/२००५ वर दि.०८.११.२०१० रोजी दिलेला निर्णय.

२) केंद्र शासनाचे पत्र क्रमांकः **T.12019/9/2005-Ophth/BC, दि. 21.10.2010.**

३) केंद्र शासनाचे पत्र क्रमांकः **T.12019/9/2005-Ophth/BC(pt.), दि. 18.07.2011.**

४) सह संचालक,आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग), मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/अंनिका/कक्ष८अ/ऑप्थॅल्मीक बोर्ड/९३५३/१३, दि.१०.०९.२०१३.

५) सह संचालक,आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग), मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/अंनिका/कक्ष८अ/ऑप्थॅल्मीक बोर्ड/----/१३, दि.०२.१२.२०१३.

६) सह संचालक,आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग), मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/अंनिका/कक्ष८अ/ऑप्थॅल्मीक बोर्ड/११३५०/१३, दि.३०.१२.२०१३.

**प्रस्तावना :**

मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या रिट पिटीशन क्र. २२८/२००५, डॉ. हर्ष भल्ला विरुध्द केंद्र शासन व इतर या याचिकेवर मा. सर्वोच्च न्यायालयाने दि. ०८.११.२०१० रोजी दिलेल्या निर्णयात राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमांतर्गत अंध विद्यालयातील विद्यार्थ्यांची नेत्र तपासणी व उपचाराकरीता राज्यात राज्यस्तरीय /जिल्हास्तरीय किंवा विभागीय स्तरावर नेत्रचिकित्सा मंडळ स्थापन करण्याबाबत निर्देश दिले आहेत. त्यानुसार राज्यात राज्यस्तरीय/जिल्हास्तरीय किंवा विभागीय स्तरावर नेत्रचिकित्सा मंडळ स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

मा. सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटीशन क्र. २२८/२००५ मध्ये दिलेल्या निर्देशानुसार राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमांतर्गत अंध विद्यालयातील अंध विद्यार्थ्यांची नेत्र तपासणी व उपचार होण्याच्या दृष्टिने राज्यात राज्यस्तरीय, जिल्हास्तरीय आणि मुंबई स्तरीय (बृहन्मुंबई) पुढील प्रमाणे नेत्रचिकित्सा मंडळ स्थापन करण्याचा निर्णय घेतला आहे.

### १) राज्यस्तरीय नेत्रचिकित्सा मंडळ :

| | | | |
|---|---|---|---|
| १ | संचालक, आरोग्य सेवा, मुंबई | : | अध्यक्ष |
| २ | विभाग प्रमुख (नेत्र), जे.जे.रुगणालय, मुंबई | : | सदस्य |
| ३ | मुंबई नेत्रचिकित्सा संस्थेमार्फत नामनिर्देशित सदस्य | : | सदस्य |
| ४ | राष्ट्रीय अंध संघटना नामनिर्देशित सदस्य | : | सदस्य |
| ५ | सहायक संचालक (नेत्र), आरोग्य सेवा, मुंबई | : | सदस्य सचिव |

### २) जिल्हास्तरीय नेत्रचिकित्सा मंडळ :

| | | | |
|---|---|---|---|
| १ | जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय | : | अध्यक्ष |
| २ | जिल्हा नेत्र शल्य चिकित्सक, वर्ग-१, जिल्हा रुग्णालय | : | सदस्य |
| ३ | नेत्र शल्य चिकित्सक (वर्ग-१ किंवा २), जिल्हा रुग्णालय | : | सदस्य |
| ४ | जिल्हा कार्यक्रम व्यवस्थापक (नेत्र), संबंधित जिल्हा- | : | सदस्य सचिव |

### ३) मुंबई नेत्रचिकित्सा मंडळ

| | | | |
|---|---|---|---|
| १ | उप संचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ | : | अध्यक्ष |
| २ | राष्ट्रीय अंध संघटना (जिल्हा सदस्य), मुंबई | : | सदस्य |
| ३ | सहाय्यक संचालक (नेत्र), आरोग्य सेवा, मुंबई | : | सदस्य सचिव |

### नेत्रचिकित्सा मंडळाची उद्दिष्ट्ये व कार्ये

१) जिल्हास्तरीय किंवा मुंबई स्तरीय नेत्रचिकित्सा मंडळाने वर्षातून एकदा जिल्ह्यातील सर्व अंध विद्यालयातील विद्यार्थ्यांची नेत्र तपासणी करणे.

२) अंध विद्यालयात भरती करण्यापुर्वी अंध विद्यार्थ्यांना अंधाचे प्रमाणपत्र देणे (Certificate of incurable Blindness). त्यानंतरच अंध व्यक्तिंना अंध विद्यालयात भरती करता येईल.

३) क्युरेबल अंध व्यक्तिंना सुसज्ज रुग्णालयात संदर्भित करणे, ज्या ठिकाणी नेत्र तपासणीकरीता सर्व सोई व नेत्रतज्ञ (Pediatric Ophthalmology, Corneal, Vitro retinal Surgeon) उपलब्ध राहतील.

- अंध व्यक्तिंचा तपासणी अहवाल संबंधित अंध विद्यालयातील संस्था चालक/ प्रमुखांनी ठेवायचा आहे.
- तसेच क्युरेबल अंध व्यक्तिंना केलेल्या उपचाराबाबतचा अहवाल संबंधित जिल्ह्यातील जिल्हा कार्यक्रम व्यवस्थापक (नेत्र) यांनी ठेवायचा आहे.
- अंध विद्यालयातील विद्यार्थ्यांची तपासणी /उपचाराबाबतचा मासिक/त्रैमासिक/ वार्षिक अहवाल जिल्हा कार्यक्रम व्यवस्थापक (नेत्र) यांनी राज्यस्तरीय नेत्रचिकित्सा मंडळास पाठवावयाचा आहे.
- या योजने अंतर्गत येणाऱ्या खर्चाची प्रतिपुर्ती करण्याचा अधिकार जिल्हा आरोग्य सोसायटी यांना देण्यात येणार आहे. यामध्ये प्रामुख्याने अंध व्यक्तिंची :
  - i) नेत्र तपासणी व उपचारावरील खर्च
  - ii) संदर्भित केलेल्या अंध व्यक्तिंची शस्त्रक्रिया व औषध उपचारावरील खर्च
  - iii) Low Vision aids किंवा चष्म्यावरील खर्च
  - iv) मंडळाचे अध्यक्ष/ सभासद यांचा प्रवास खर्च व दैनिक भत्ता

## नेत्रचिकित्सा मंडळाचे कार्यक्षेत्र

१) **राज्य नेत्रचिकित्सा मंडळ : संपुर्ण राज्याकरीता**
राज्यातील सर्व जिल्हा नेत्रचिकित्सा मंडळाकडून संदर्भित केलेल्या रुग्णांची तपासणी करणे व उपचार करणे.

२) **जिल्हा नेत्रचिकित्सा मंडळ : संपुर्ण जिल्ह्याकरीता**
जिल्ह्यातील अंध शाळेतील विद्यार्थ्यांची तपासणी व उपचार करणे तसेच त्यांचेकडे नेत्र विशेषतज्ञ उपलब्ध नसल्यास पुढील उपचाराकरीता विद्यार्थ्यांना राज्य नेत्रचिकित्सा मंडळाकडे संदर्भित करणे.

३) **मुंबई नेत्रचिकित्सा मंडळ : मुंबई शहर व उपनगरे**
मुंबई शहर व उपनगर भागातील सर्व अंध शाळेतील विद्यार्थ्यांची तपासणी व उपचार करणे तसेच त्यांचेकडे नेत्र विशेषतज्ञ उपलब्ध नसल्यास पुढील उपचाराकरीता विद्यार्थ्यांना राज्य नेत्रचिकित्सा मंडळाकडे संदर्भित करणे.

२. राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमांतर्गत अंध विद्यालयातील विद्यार्थ्यांची तपासणी व उपचार या योजनेची उद्दिष्ट्ये व कार्ये यानुसार अंध विद्यालयातील विद्यार्थ्यांची नेत्र तपासणी, उपचारा दरम्यान करावयाच्या विशेष चाचण्या, औषधापचार, शस्त्रक्रिया, अल्पदृष्टीहीनांना चष्मे देणे यावर होणारा खर्च राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमांतर्गत प्राप्त होणाऱ्या त्या त्या वर्षातील अनुदानातून खालील लेखाशीर्षातून भागविण्यात यावा.

२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०६- सार्वजनिक आरोग्य
८००- इतर खर्च
केंद्र पुरस्कृत योजना (केंद्र हिस्सा ७५ टक्के)
(०१)(२९) राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रम (राअंनिका)
३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)
(२२१० एफ २६४)

केंद्र पुरस्कृत योजना (राज्य हिस्सा २५ टक्के)
(०१)(३०) राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रम (राअंनिका)
३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)
(२२१० एफ २७३)

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०२१४०००२१४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dnyandeo Laxman Sul

Digitally signed by Dnyandeo Laxman Sul
DN: CN = Dnyandeo Laxman Sul, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.06.02 16:56:07 +05'30'

**( ज्ञा. ल. सुळ )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. आयुक्त (कुटुंब कल्याण) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनायल, मुंबई.

३. सह संचालक, आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४. सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. सहायक संचालक (नेत्र), आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
६. अधिष्ठाता, सर जे.जे. रुग्णालय, मुंबई.
७. मा. मंत्री (सार्वजनिक आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा. राज्यमंत्री (सार्वजनिक आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. जिल्हाधिकारी (सर्व)
१०.अतिरिक्त आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
११.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१२. अधिष्ठाता, वैद्यकीय महाविद्यालय संलग्न रुग्णालये (सर्व)
१३. प्रधान सचिव (सा.आ.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१४. जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व)
१५. विभाग प्रमुख (नेत्र), सर जे.जे.रुग्णालय, मुंबई.
१६. प्राध्यापक व विभाग प्रमुख (नेत्र), लोकमान्य टिळक वैद्यकीय महाविद्यालय, सायन, मुंबई.
१८. प्राध्यापक व विभाग प्रमुख (नेत्र), सेठ जी.एस. वैद्यकीय महाविद्यालय, परेल, मुंबई.
१९. प्राध्यापक व विभाग प्रमुख (नेत्र), शासकीय वैद्यकीय महाविद्यालय/जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय (सर्व)
२०. प्राध्यापक / सहयोगी प्राध्यापक (नेत्र), शासकीय वैद्यकीय महाविद्यालय किंवा जिल्हा नेत्र शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय (सर्व)
२१. जिल्हा कार्यक्रम व्यवस्थापक (नेत्र), अंधत्व नियंत्रण कार्यक्रम, (सर्व)
२२. मुंबई नेत्रचिकित्सा संस्था, मुंबई (सह संचालक, आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग) यांचेमार्फत)
२३. राष्ट्रीय अंध संघटना, मुंबई. (सह संचालक, आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग) यांचेमार्फत)
२४. प्राध्यापक व विभाग प्रमुख (नेत्र), सेंट जॉर्जेस रुग्णालय, मुंबई.
२५. प्राध्यापक व विभाग प्रमुख (नेत्र),गोकुळदास तेजपाल रुग्णालय, मुंबई.
२६. प्राध्यापक / सहयोगी प्राध्यापक (नेत्र), सेंट जॉर्जेस रुग्णालय, मुंबई.
२७. प्राध्यापक / सहयोगी प्राध्यापक (नेत्र), गोकुळदास तेजपाल रुग्णालय, मुंबई.
२८. जिल्हा कार्यक्रम व्यवस्थापक (नेत्र), बृहन्मुंबई महानगरपालिका नेत्र रुग्णालय, मुंबई.
२९. निवडनस्ती (आरोग्य-५)